पत्र

प्रति,

१] मंत्रालयीन विभाग आणि त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख.

२] सर्व जिल्हाधिकारी.

क्रमांक: सीएनएस-१०८७/०/सीआर-१४/१६-अ,

सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १३ मार्च, १९८७.

विषय:- स्वातंत्र्य सैनिक/भूमिगत स्वातंत्र्य सैनिक/आझाद हिंद [स्वातंत्र्य] सैनिक यांचे नामनिर्देशितास शासकीय सेवेत वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावर नोकरी मिळणेबाबत.

उपरोक्त विषयाच्या संदर्भात भूमिगत स्वातंत्र्य सैनिक/आझाद हिंद [स्वातंत्र्य] सैनिक यांच्या नामनिर्देशितास शासकीय सेवेत नोक-या देतांना नियुक्ती अधिका-यांकडून त्यांच्याकडील सन्मानपत्राच्या आधारे नोकरी देण्याबाबत विचार केला जात नाही अशा ब-याचशा तक्रारी शासनाकडे आलेल्या आहेत. तसेच भूमिगत स्वातंत्र्य सैनिकांना सन्मानपत्राच्या आधारे शासकीय सेवेत नोकरी द्यावयाची किंवा कसे अशी विचारणा काही जिल्हाधिका-यांकडून आलेली आहे. याबाबत आता असे स्पष्ट करण्यात येते की, स्वातंत्र्य सैनिकाच्या नामनिर्देशिताने नोकरी विषयक सवलतीचा फायदा घेण्यासाठी सन्मानपत्र [सत्य प्रत] सादर केल्यानंतर शासन परिपत्रक, ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-१०६५/४६५२-जे, दिनांक १३ ऑक्टोबर १९६५ च्या परिच्छेद १ मधील टिप्पणी [१] मध्ये नमूद केलेल्या परिस्थिती संदर्भातील कागदपत्रे सादर करण्याची आवश्यकता नाही कारण सन्मानपत्र देते वेळी ह्या टिप्पणी [१] मध्ये नमूद केलेल्या कागदपत्रांची छाननी होऊनच शासनाने स्वातंत्र्य सैनिकांस सन्मानपत्र प्रदान केलेले असते.

२. स्वातंत्र्य सैनिकांना उपलब्ध असलेल्या सर्व नोकरी विषयक सवलती आता भूमिगत स्वातंत्र्य सैनिक तसेच आझाद हिंद [स्वातंत्र्य] सैनिक यांनाही उपलब्ध होऊ शकतात. मात्र शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. सीएनएस-१०८२/३६९९/ सीआर-२८/८५/१६-अ, दिनांक २२ नोव्हेंबर १९८५ अन्वये नियुक्ती अधिका-यांस ना-हरकत प्रमाणपत्र देण्यापूर्वी जिल्हाधिका-यांनी स्वातंत्र्य सैनिकांचे किंवा भूमिगत स्वातंत्र्य सैनिकांचे मूळ सन्मानपत्र पडताळून पहाणे आवश्यक आहे.

प्र. द. माळवे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

---

शा. म. मु. रोटा/सा. प्र. वि. /एच-९३६[४०००-३-८७]